**महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा -**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र.सीडीए-१००५/(४१७/२००५)/लाक्षेवि(कामे)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ ऑगस्ट, २००९

**प्रस्तावना :-**

राज्याच्या जलनिती (जुलै, २००३) अनुसार सिंचन व्यवस्थापनात लाभधारक शेतक-यांचा सहभाग असण्यासाठी सिंचन प्रणालीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन होणे आवश्यक आहे. यास कायद्याचे पाठबळ देण्यासाठी महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन कायदा मे, २००५ मध्ये करण्यात आला.

सहभागी सिंचन व्यवस्थापन यशस्वी होण्यासाठी पाणी वापर संस्थांचे व्यवस्थापन कार्यक्षम असणे व पाणी वापर संस्थांनी स्वबळावर सुदृढ (सेल्फ सस्टेनेबल) होणे आवश्यक आहे. यास्तव पाणी वापर संस्थांना कार्यक्षम व्यवस्थापनाकरीता महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा योजना सुरु करण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय :**

सिंचन व्यवस्थापनात लाभधारकांचा सहभाग यशस्वी होण्यासाठी कार्यान्वित पाणी वापर संस्थांचे व्यवस्थापन कार्यक्षम राहून संस्था नेहमीसाठी स्वबळावर सुदृढपणे कार्यरत राहणे आवश्यक आहे. पाणीवापर संस्थांना प्रोत्साहन देण्याकरिता पाणीवापर संस्थांच्या व्यवस्थापनामध्ये स्पर्धा निर्माण होण्यासाठी महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत दरवर्षी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा आयोजित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. प्रादेशिक व राज्यस्तरावरील पुरस्कार वितरण समारंभ दरवर्षी “ **दि.२६ फेब्रुवारी** ” रोजी (कै.शंकररावजी चव्हाण, केंद्रिय माजी गृहमंत्री व महाराष्ट्र राज्याचे माजी मुख्यमंत्री यांचा स्मृतीदिन ) “ **सिंचन दिनाच्या** ” दिवशी आयोजित करण्यात यावा.

**१) महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान :**

महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियानाकरीता कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ यांच्या अध्यक्षतेखाली कृती समिती गठीत करण्याबाबत स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. या समितीमध्ये महामंडळाच्या कार्यक्षेत्रातील मुख्य अभियंता, सिंचन विभागाचे अधिक्षक अभियंता, कृषि सहसंचालक व पाणी वापर संस्थांच्या क्षेत्रात कार्यरत अशासकीय संस्था हे सदस्य आहेत. या समितीचे सदस्य सचिव स्थानिक सिंचन विभागाचे कार्यकारी अभियंता राहतील. दि. १ ते १० सप्टेंबर दरम्यान कृती समितीची बैठक कार्यकारी संचालक यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात यावी. महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियानाची औपचारिक सुरुवात दरवर्षी दि.१५ सप्टेंबर पासून करण्यात यावी.

महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियानात पुढील प्रमाणे कार्यवाही करण्याबाबत कृती समितीने सर्व संबंधित कालवा अधिका-यांना सुचना द्याव्यात. तसेच याप्रमाणे कार्यवाहीचे संनियंत्रण महामंडळस्तरावर करण्यात यावे.

१) महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन कायदा २००५ व नियम २००६ मधील तरतूदी पाणी वापर संस्थांना अवगत करण्यात याव्यात.

२) पाणी वापर संस्था संदर्भातील शासन निर्णय / शासन परिपत्रक यातील तरतूदी पाणी वापर संस्थेच्या निदर्शनास आणाव्यात.

३) कार्यक्षम व्यवस्थापनासाठी पाणी वापर संस्थांनी कोणत्या उपाय योजना कराव्यात, याबाबत पाणी वापर संस्थांना माहिती देण्यात यावी.

४) पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धेबाबत सर्व पाणी वापर संस्थांना माहिती देण्यात यावी. स्पर्धेत सक्रीय सहभागी होण्याचे आवाहन सर्व पाणी वापर संस्थांना करण्यात यावे.

५) अभियान कालावधीत प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील प्रत्येक पाणी वापर संस्थेची आमसभा आयोजित करावी. आमसभेत विभागाचे अधिकारी यांनी मार्गदर्शन करावे.

**२) पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा :**

महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियानांतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा प्रदेशस्तरावर व राज्यस्तरावर घेण्यात येईल.

या स्पर्धेसाठी कार्यान्वित पाणी वापर संस्थांकडून नामांकन मागविण्यात येतील. या स्पर्धेसाठी इच्छुक पाणी वापर संस्थांनी विभागाचे कार्यकारी अभियंता यांचेकडे १५ सप्टेंबर ते १५ ऑक्टोबर दरम्यान विहित नमुन्यात प्रादेशिक स्तरावरील पुरस्कारासाठी नामांकने दाखल करावीत.

**३)** पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धेसाठी प्राप्त झालेल्या नामांकनानुसार प्रादेशिकस्तर/राज्यस्तरावरील पुरस्कारासाठी छाननी करण्यात येईल. या करीता छाननीसमिती गठीत करण्याबाबत स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. या समित्यांची सर्वसाधारण रचना खालील प्रमाणे आहे. या समितीमध्ये आवश्यकतेनुसार बदल करण्याचे अधिकार जलसंपदा विभागास राहतील.

**प्रदेशस्तरीय छाननी समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १) | प्रदेशाबाहेरील मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग | अध्यक्ष |
| २) | प्रदेशातील सहसंचालक कृषी | सदस्य |
| ३) | सहकार सह निबंधक | सदस्य |
| ४) | प्रदेशातील पाणी वापर संस्थेच्या क्षेत्रात कार्यरत अशासकीय संस्थेचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| ५) | विद्यापीठ/अभियांत्रिकी महाविद्यालय व तत्सम यांचे प्राचार्य किंवा सिंचन विषयाशी संबंधित एक प्राध्यापक | सदस्य |
| ६) | पाणी वापर संस्थांचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| ७) | प्रदेशातील सिंचन व्यवस्थापनाचे कार्यकारी अभियंता | सदस्य सचिव |

**राज्यस्तर छाननी समिती :**

| | | |
|---|---|---|
| १) | सचिव (जलसंपदा) | अध्यक्ष |
| २) | सचिव (लाक्षेवि) | सदस्य |
| ३) | प्रधान सचिव (कृषी) | सदस्य |
| ४) | प्रधान सचिव (जलसंधारण) | सदस्य |
| ५) | महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद | सदस्य |
| ६) | सहकार आयुक्त, पुणे | सदस्य |
| ७) | पाणी वापर संस्थेच्या क्षेत्रात कार्यरत अशासकीय संस्थेचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| ८) | पाणीवापर संस्थांचा एक प्रतिनिधी | सदस्य |
| ९) | उप सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग | सदस्य सचिव |

**४)** **मुल्यमापनाची पध्दत :** पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धेकरीता प्राप्त नामांकनाची छाननी/तपासणी खालील दर्शक व कागदपत्रे यांचे आधारे

करण्यात यावी.  प्रत्येक दर्शकासाठी एकूण अनुज्ञेय गुण (वेटेज) त्या दर्शकासमोर दर्शविले आहेत. दर्शकामध्ये व गुणांमध्ये आवश्यकतेनुसार बदल करण्याचे अधिकार जलसंपदा विभागास राहतील.

| **क्र.** | **दर्शक** | **गुण** |
|---|---|---|
| १ | १.१) संस्थेच्या कामकाजात सर्व सदस्यांचा सक्रिय सहभाग | १० |
| | १.२) संस्थेच्या दैनंदिन कामकाजात व निर्णय प्रक्रियेत महिला सदस्यांचा सहभाग | १० |
| | **एकूण (१)** | **२०** |
| २ | २.१) एक दशलक्ष घनमीटर पाण्यात भिजलेले क्षेत्र | १० |
| | २.२) पाणी वाटपातील समानता | ५ |
| | २.३) पाण्याचा हिशोब ठेवण्याची पध्दत | ५ |
| | **एकूण (२)** | **२०** |
| ३ | ३.१) प्रती घनमीटर प्रत्यक्ष कृषी उत्पन्न | १० |
| | **एकूण (३)** | **१०** |
| ४ | ४.१) संस्थेच्या कार्यक्षेत्रातील लागवडी योग्य क्षेत्र व प्रत्यक्ष भिजलेले क्षेत्र | १० |
| | **एकूण (४)** | **१०** |
| ५ | ५.१) पाणीपट्टी आकारणी व वसूल | १० |
| | ५.२) संस्थेचा ताळेबंद, नफा, तोटा | ५ |
| | ५.३) लेखापरिक्षण | ५ |
| | **एकूण (५)** | **२०** |
| ६ | ६.१) शेतचारी/शेतचर ची नियमित परिरक्षण व दुरुस्ती | १० |
| | ६.२) उप-वितरिकेची नियमित परिरक्षण  व दुरुस्ती | १० |
| | **एकूण (६)** | **२०** |
| | **सर्व एकूण** | **१००** |

प्राप्त नामांकनाची छाननी/तपासणीचा कालावधी खालीलप्रमाणे राहिल.

प्रादेशिक स्तर तपासणी        १ नोव्हेंबर ते ३१ डिसेंबर

राज्यस्तर तपासणी        १  जानेवारी ते ३१ जानेवारी

विविध स्तरावरील प्राप्त नामांकनाच्या तपासणीतून प्रादेशिकस्तरावर प्रथम व द्वितीय आणि राज्यस्तरावर प्रथम, द्वितीय व तृतीय पुरस्कारासाठी पाणी वापर संस्थांची निवड करण्यात येईल.

**५)** पुरस्कार प्राप्त संस्थांनी त्यांचा दर्जा भविष्य काळात राखणे आवश्यक आहे. यासाठी संबंधित सिंचन विभागाचे कार्यकारी अभियंताकडून पुरस्कार प्राप्त पाणी वापर संस्थेच्या दर्जाचे

वार्षिक मुल्यांकन करण्यात यावे. तसेच पुरस्कार प्राप्त संस्थांना पुढील ५ वर्षे स्पर्धेत सहभागी होता येणार नाही.

६) **पुरस्कार वितरण समारंभ :-** प्रादेशिक व राज्यस्तरावरील पुरस्कार वितरण समारंभ दरवर्षी " **दि.२६ फेब्रुवारी** " रोजी (कै.शंकररावजी चव्हाण, केंद्रिय माजी गृहमंत्री व महाराष्ट्र राज्याचे माजी मुख्यमंत्री यांचा स्मृतीदिन ) " **सिंचन दिनाच्या** " दिवशी आयोजित करण्यात यावा.

७) **पुरस्काराची रक्कम पुढीलप्रमाणे राहील.**

| | |
|---|---|
| प्रादेशिकस्तर पुरस्कार :- | प्रथम क्रमांक रु. ३ लक्ष व प्रशस्तीपत्र |
| | द्वितीय क्रमांक रु. २ लक्ष व प्रशस्तीपत्र |
| राज्यस्तर पुरस्कार :- | प्रथम क्रमांक रु. ७ लक्ष व प्रशस्तीपत्र |
| | द्वितीय क्रमांक रु. ५ लक्ष व प्रशस्तीपत्र |
| | तृतीय क्रमांक रु. ३ लक्ष व प्रशस्तीपत्र |

८) **पुरस्कार रकमेचा विनियोग :-**

अ) पाणी वापर संस्था व्यवस्थापन स्पर्धेतर्गत पाणी वापर संस्थांना प्रत्येक स्तरावर वितरीत करण्यात येणाऱ्या पुरस्काराच्या रकमेचा विनियोग करण्यासाठी पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

१) पुरस्कार प्राप्त झालेल्या पाणी वापर संस्थेची विशेष आमसभा बोलवून त्या सभेत विनियोगाबाबत निर्णय घेण्यात यावा.

२) पाणी वापर संस्थेच्या प्रशासकीय व कार्यालयीन नवीन बाबींसाठी पुरस्कार रकमेच्या ५ टक्के पर्यंत खर्च करता येईल.

३) पाणी वापर संस्थेंच्या दृष्टीने सामुहिक उपयोगाची यंत्रसामुग्री उपकरणे (छोटे ट्रॅक्टर, मळणी यंत्र इ.) खरेदी करणेबाबत आमसभेच्या सर्वसंमतीने निर्णय घेण्यात यावा. तसेच प्रति घनमीटर पाण्यात जास्तीतजास्त कृषी उत्पादन करणेसाठी उपाययोजना करण्याकरिताही निर्णय घेण्यात यावा.

४) पुरस्काराच्या रकमेतून कोणत्याही परिस्थितीत पाणीवापर संस्थेच्या दैनंदिन स्वरुपाचा खर्च करता येणार नाही.

५) शिल्लक राहणारी पुरस्काराची रक्कम पाणी वापर संस्थेच्या नावे राष्ट्रीयकृत बँकेत मुदत ठेव, राष्ट्रीय बचत प्रमाणपत्र वगैरे मध्ये गुंतवावी. प्राप्त व्याजाच्या रकमेचा विनियोग आमसभेच्या मान्यतेने करता येईल.

वरील सूचना पुरस्कार प्राप्त करणाऱ्या पाणी वापर संस्थांच्या निदर्शनास आणण्यात याव्यात. वरील सूचनांची अंमलबजावणी पाणी वापर संस्था करीत आहेत किंवा कसे याची पाहणी संबधित कार्यकारी अभियंता व विभागीय लेखापाल यांच्यातर्फे करण्यात यावी.

**९) पुरस्कार योजनेचे पुनर्विलोकन** :

महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन स्पर्धा ५ वर्षांसाठी राहील. ५ वर्ष पूर्ण झाल्यावर या पुरस्कार योजनेचा आढावा घेण्यात येईल व आवश्यकतेनुसार योजनेत सुधारणा करण्यात येईल.

**१०)** पुरस्कार योजनेवर होणारा खर्च, मुख्य लेखाशिर्ष २७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे (योजनेतर) व २७०२ लहान पाटबंधारे (योजनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३३६/व्यय-१२, दि.२०.८.२००९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८२११६३५०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( चं.रा.तेजाळे )
शासनाचे उपसचिव

**प्रत,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व पालक सचिव, मंत्रालय, मुंबई

सर्व विभागीय सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त, कृषी, पुणे
आयुक्त, सहकार, पुणे
सर्व जिल्हाधिकारी
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी संचालक
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंता
जलसंपदा विभागातील सर्व अधिक्षक अभियंता
जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी अभियंता
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
नियोजन विभाग, (१४३३) मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१२) मंत्रालय, मुंबई
संपर्क अधिकारी, (जलसंपदा विभाग) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
प्रत लाक्षेवि (कामे) संग्रहार्थ